जलस्वराज्य - २ कार्यक्रम अंतर्गत भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेच्या तांत्रिक सक्षमीकरणाकरीता राबविण्यात यावयाच्या उपाययोजना

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः जस्वप्र-०७१४/प्र.क्र. ६२(२)/पापु-११**
७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल,
नवीन मंत्रालय, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई ४०००0१
तारीख: ०१/०८/२०१४

**वाचा :**

१) **शासन निर्णय क्रमांकः डब्ल्यु.क्यु.एम.२०१०/प्र.क्र.९८/पापु-१२, दि. ३० मार्च २०११**
२) **शासन निर्णय क्रमांकः जस्वप्र -१२१३/प्रक्र २००/पापु ११ दिनांक ४ जानेवारी २०१४**

**प्रस्तावना :**

राज्यात भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेमार्फत भूजल पातळींच्या नोंदी घेण्यासाठी १५३१ पाणलोट क्षेत्रात, त्यातील भूपृष्ठीय व भूशास्त्रीय परिस्थितीनुरुप, ३९२० निरीक्षण विहिरी प्रस्थापित करण्यात आलेल्या आहेत. राज्यातील पर्जन्यमानातील दोलायमानता तसेच क्षेत्रिय विचलन लक्षात घेता, दरवर्षी कमी अधिक प्रमाणात भेडसावणाऱ्या पाणी टंचाईचा अंदाज वर्तविता यावा व त्यावर वेळेत उपाययोजना करता याव्यात, तसेच भूजल अंदाज अधिक वास्तववादी बांधता यावा, यासाठी निरिक्षण विहिरींचे जाळे वाढविण्याची गरज निदर्शनास आली आहे.

२. राज्यात निरीक्षण विहिरींतील पाणी पातळींचे मोजमाप दरवर्षी जानेवारी, मार्च, मे व ऑक्टोबर / नोव्हेंबर या महिन्यांमध्ये केले जाते. भूजल पातळीच्या नोंदी भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील भूवैज्ञानिकांचे मदतीने घेतल्या जातात. सदर नोंदीचे विविध पातळ्यांवर विश्लेषण करुन अहवाल जिल्हा स्तरावर जिल्हाधिकाऱ्यांना व शासनास सादर करण्यांत येतो व त्यास अनुसरुन विविध प्रतिबंधात्मक उपाययोजना प्रस्तावित केल्या जातात. परंतु पाणी पातळी नोंदविणे व गेल्या पाच वर्षांच्या

सरासरी पाणी पातळीशी त्याची तुलना करुन संभाव्य पाणी टंचाईचा अंदाज घेणेच्या प्रक्रियेस बराच कालावधी लागत असल्याचे आजवरच्या अभ्यासात दिसून आलेले आहे. राज्याच्या माहिती व तंत्रज्ञान विभागाने मोठे बदल घडवून आणले असून, शासनाने राबविलेल्या ई-पंचायत उपक्रमाद्वारे प्रत्येक ग्रामपंचायतीला संगणक व इंटरनेट सेवा पुरविण्यात आलेली आहे. या बरोबरच दुरसंचार क्षेत्रात (Tele-Communication) क्षेत्रात देखील अमुलाग्र क्रांती झालेली असून प्रत्येक गावांत भ्रमणध्वनी उपलब्ध झालेले आहे. माहिती व तंत्रज्ञान क्षेत्रात विकसित होत असलेल्या नवनविन तंत्रज्ञानानुसार निरीक्षण विहीरींच्या नोंदी मोबाईल व इंटरनेटच्या माध्यमातून गावपातळीवरुन थेट विश्लेषणासाठी संगणकावर पाठविता येणे शक्य झालेले आहे.

३. भूजल ही सामुहीक संपत्ती असल्याने लोकसहभागातुन भूजल व्यवस्थापन करणे शक्य असल्याचे भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेमार्फत राज्यात राबविण्यात आलेल्या पथदर्शी प्रकल्पाद्वारे सिध्द झालेले आहे. या पार्श्वभूमीवर गांवपातळीवर भूजल व्यवस्थापन करणे आवश्यक असुन भूजल पातळीत होणारे बदल ग्रामस्तरावर मोजण्याचा शासन विचार करीत आहे. शासनाने ग्रामस्तरावर ग्राम आरोग्य, पोषण, पाणी पुरवठा व स्वच्छता समिती, जलसुरक्षक इत्यादी आधारभुत व्यवस्था निर्माण केल्या आहेत.

४. क्षेत्रिय अभ्यासाचे आधारे राज्यातील कृषी हवामान प्रदेश निहाय जलशास्त्रीय परिमाणांचे मोजमाप करुन भूजल संपत्तीचा अधिक अचूक अंदाज बांधता यावा यासाठी १९७२ पासून यंत्रणेमार्फत १० जलवेधशाळा प्रस्थापित करण्यात आलेल्या आहेत. दररोज पडणारा पाऊस, त्याची तीव्रता, दररोज होणारे बाष्पीभवन, मातीच्या ओलाव्यात रुपांतरीत होणारे पाणी, भूपृष्ठावरुन वाहून जाणारे पाणी इत्यादी बाबी जलवेधशाळेंमध्ये अभ्यासल्या जातात. या सर्व परिमाणांच्या मोजमापात अत्याधूनिक तंत्रज्ञानाचा वापर केला जात आहे. त्यांच्या उपयोगातून ही सर्व परिमाणे थेट संगणकावर उपलब्ध करुन घेणे शक्य आहे.

५. यासर्व बाबी भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेचे माध्यमातून राबवुन भूजल शास्त्रीय आधार सामुग्रीचे व पर्यायाने व्यवस्थेचे सक्षमीकरण जलस्वराज्य - २ कार्यक्रमांतर्गत करण्यासाठी खालीलप्रमाणे मार्गदर्शक सूचना देण्यात येत आहेत.

## शासन परिपत्रक:

### १. नियोजन

१.१. राज्यातील भूजल विषयक तांत्रिक माहितीचे सक्षमीकरणासाठी खालील कामे भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणे मार्फत राबविण्यात येतील.

१.२. **निरिक्षण विहिरींचे जाळे वाढविणे:** गांवपातळीवर भूजल उपलब्धतेचा अधिक अचूक अंदाज बांधता यावा तसेच दरवर्षी पडणारा पाऊस व भूजल पातळी यांचा संबंध तांत्रिकदृष्टया प्रस्थापित करुन संभाव्य पाणी टंचाईचा वास्तववादी अंदाज घेऊन प्रतिबंधात्मक उपाययोजना करता याव्यात, या उद्देशाने भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेद्वारा गांव पातळीवर निरीक्षण विहीरींचे जाळे निश्चित करणेत यावे. त्याच प्रमाणे गांव पातळीवर भूजल पातळीचे मोजमाप लोक सहभागातून घेण्यास सुरवात करण्यात यावी.

१.३. **वेळ सापेक्ष आधार सामुग्री सनियंत्रण:** निरीक्षण विहिरीतील पाणी पातळीच्या नोंदी क्षेत्रावरुनच थेट संगणकावर पाठवीता याव्यात यासाठी **वेळ सापेक्ष आधार सामुग्री सनियंत्रणासाठी** (Real Time Data Monitoring) कार्यप्रणाली विकसित करण्यात येऊन पथदर्शी स्वरुपात चंद्रपुर व औरंगाबाद जिल्ह्यात त्याची अंमलबजावणी सुरु करणेत यावी.

१.४. **जलवेध शाळांचे बळकटीकरण:** १९७२ पासून आजतागायत जलवेध शाळेत विविध जलशास्त्रीय परिमाणे क्षेत्रावर मोजण्याची व त्या आधारावर कृषी हवामान प्रदेशांतील पाण्याचा हिशेब लावण्याची जबाबदारी यंत्रणेमार्फत पार पाडली जात आहे. जलवेध शाळेच्या परिमाणांची मोजमापे अधिक अचूक घेता यावी व त्या क्षेत्रातील अत्याधुनिक तंत्रज्ञानाचा वापर

करुन विविध परिमाणाची मोजमापे अधिक अचूकपणे घेता यावीत यासाठी जलवेध शाळेच्या बळकटीकरण करण्यात यावे.

## २. अंमलबजावणी

### २.१.निरिक्षण विहिरींचे जाळे वाढविणे व मोजमापे घेणे

**२.१.१.** राज्यातील ३३ जिल्ह्यातील सर्व गावांमध्ये किमान एक या प्रमाणे निरीक्षण विहीर निश्चित करण्यात यावी. तांत्रिकदृष्टया अयोग्य अथवा लोकवस्ती नसलेली अथवा विहिरी नसलेली गावे यातुन वगळण्यात यावीत.

**२.१.२.** निरीक्षण विहीर निश्चित करण्यासाठी संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांनी देवू केलेल्या मार्गदर्शक तत्वांचा अवलंब करण्यात यावा व तांत्रिकदृष्ट्या योग्य असलेल्या सर्व गावांमध्ये निरीक्षण विहीर निश्चित करण्याचे काम पुर्ण करावयाचे आहे.

**२.१.३.** निश्चित करण्यात आलेल्या निरीक्षण विहीरींच्या कठड्याच्या दर्शनी भागावर निरीक्षण विहीरी बाबतची माहिती रंगविण्यात यावी.

**२.१.४.** निरीक्षण विहीर निश्चित करणेसाठी सर्वेक्षण करणा-या भूवैज्ञानीकांनी निरीक्षण विहीर निश्चित केल्यानंतर त्याचा तपशील संबधीत गावाच्या सरपंच, ग्रामपंचायतीचे पदाधिकारी, जलसुरक्षक, ग्रामसेवक व तलाठी यांना अवगत करुन द्यावयाचा आहे. तसेच भूजल पातळी मोजमापाची प्रक्रीया देखील समजवून देणेसाठी गावात जनजागृती देखिल करावयाची आहे.

**२.१.५.** निरीक्षण विहीर निश्चिती बाबतची कामे पुर्ण झाल्यानंतर गांव पातळीवरील निरीक्षण विहिरींतील पाणी पातळी मोजमापाची जबाबदारी संबंधित गावाचे ग्राम सेवक यांची राहणार असून तांत्रिक पर्यवेक्षण व मार्गदर्शन संबंधित जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांचे राहील.

**२.१.६.** ग्रामसेवकाने ग्राम पातळीवर नेमण्यात आलेल्या पाणी पुरवठा मदतनिसाची (जलसुरक्षक) क्षमता बांधणी करुन अथवा गावातील शिक्षित युवकांची क्षमता बांधणी करुन त्यांचे मदतीने पाणी पातळी मोजण्याची कार्यवाही करावी. गट विकास अधिकारी, पंचायत समिती यांनी या साठी आवश्यकतेनुसार सर्वतोपरी मदत करावयाची आहे.

**२.१.७.** गावपातळीवर मोजमाप केल्या जाणाऱ्या भूजल पातळींच्या नोंदीसाठी स्थानिकस्तरावर नोंदवही ठेवण्यात यावी. त्याचप्रमाणे ग्रामपंचायत स्तरावर असलेल्या संगणक व इंटरनेटच्या मदतीने या पाणी पातळीच्या नोंदी जिल्हा कार्यालयास पाठविण्यात याव्यात.

**२.१.८.** ग्रामपंचायत स्तरावर घेण्यात आलेल्या पाणी पातळींच्या नोंदी जिल्हा कार्यालयास पाठविण्याबाबतची कार्यपध्दती, संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा हे काही जिल्हयात पथदर्शी स्वरुपात राबवुन प्रकल्प कालावधीच्या उत्तरार्धात निश्चित करतील. त्यानंतर शासन अनुमतीने सदर कार्यपध्दती सर्व जिल्ह्यात राबविण्यात येईल.

**२.१.९.** गावपातळीवरील निरीक्षण विहीरींचे माध्यमातून मोजल्या जाणा-या पाणी पातळीच्या नोंदीचा उपयोग करुन प्रचलीत कायद्यानुसार संभाव्य पाणी टंचाई अहवाल, भूजल मुल्यांकन आदी कामे केली जावीत. भूजल पातळीच्या नोंदी आवश्यक ती प्रक्रीया करुन संकेत स्थळावर नकाशे स्वरुपात प्रकाशित करण्यात याव्यात.

२.२.**वेळ सापेक्ष आधार सामुग्री सनियंत्रण** (Real Time Data Monitoring System)

**२.२.१.** हा उपप्रकल्प पथदर्शी स्वरुपात औरंगाबाद व चंद्रपूर जिल्हयात राबविण्यात येईल.

**२.२.२.** या अंतर्गत भूजल पातळीच्या तसेच दैनंदिन पर्जन्यमानाच्या नोंदी देखील घेतल्या जातील व मोजमाप केलेली सर्व परिमाणे मोबाईल/इतर उपकरणांद्वारे थेट क्षेत्रावरुन संगणक सर्व्हरवर पाठविली जातील.

**२.२.३.** या उपप्रकल्पांतर्गत परिच्छेद २.१.१. नुसार निश्चित करण्यात आलेल्या निरिक्षण विहीरी अभ्यासासाठी विचारात घेण्यात याव्यात.

**२.२.४.** दोनही जिल्ह्यात तांत्रिक निकषांचे आधारावर पर्जन्यमापकांची संख्या निश्चित करण्यात येऊन त्यानुसार गांवे निवडण्यात यावीत.

**२.२.५.** पर्जन्यमापक भारतीय मोसम विभागाच्या मार्गदर्शक तत्वांनुसार बसविण्यात यावीत. ती बसवित असताना शक्यतोवर शासकीय इमारतींच्या आवारात (ग्रामपंचायत, शाळा इ.) बसविण्यास प्राधान्य देण्यात यावे. पर्जन्यमापकाच्या संरक्षणाची व देखरेखीची जबाबदारी ग्रामपंचायत व ग्रामसेवक यांची असेल.

**२.२.६.** या उपप्रकल्पांतर्गतच्या सर्व व्यवस्था कार्यान्वीत झाल्यावर दोनही जिल्ह्यातील प्रत्येक गांवात रोज वापरात असलेल्या पेयजल स्रोतांतील पाण्यातील शिल्लक क्लोरीनची मात्रा (Residual Chlorine)(क्लोरोस्कोपद्वारा मोजली जाणारी) देखील तपासावयाची आहे.

**२.२.७.** या प्रकल्पांतर्गत घेण्यात यावयाच्या सर्व नोंदी संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांनी वेळोवेळी दिलेल्या मार्गदर्शक सुचनांनुसार घेणेत याव्यात. सर्व नोंदी निर्धारीत केलेल्या नोंदवहीत जलसुरक्षामार्फत अथवा गांवातील शिक्षक अथवा शिक्षित युवकांच्या मदतीने नोंदविण्यात याव्यात. सर्व नोंदी घेणे व त्याच्या योग्या योग्यतेची खात्री करुन घेणे संदर्भातील जबाबदा-या खालील प्रमाणे निश्चित करणेत येत आहेत.

**२.२.७.१.** **जलसुरक्षक** - संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांनी देऊ केलेल्या मार्गदर्शक सुचनांनुसार भूजल पातळीच्या नोंदी (निरिक्षण विहिरीतील), पावसाळ्यात दैनीक पर्जन्यमान तसेच पेयजल स्रोतांतील पाण्यातील शिल्लक क्लोरीनचे प्रमाण व गुणवत्ता मोजणे व सर्व नोंदी निर्धारीत पद्धतीने एसएमएस किंवा इतर माध्यमांद्वारे मध्यवर्ती सर्व्हरला (central server) पाठविण्याची जबाबदारी जलसुरक्षकाची

असेल. तसेच भूजल पातळीच्या आधारावर जनजागृती करणेची जबाबदारी देखील पार पाडावी लागणार आहे.

२.२.७.२. **ग्रामसेवक** - ग्रामसेवकांनी जलसुरक्षकामार्फत भूजल पातळीच्या नोंदी, दैनीक पर्जन्यमान तसेच पेयजल स्रोतातील शिल्लक क्लोरीनचे प्रमाण व गुणवत्ता याबाबतची माहिती विहित वेळेत घेतल्या जात असल्याची व ती मध्यवर्ती सर्व्हर ला नियमीतपणे पाठविण्यात येत असल्याची खात्री करणे, सर्व नोंदवह्या स्वतःच्या ताब्यात ठेवणे व वेळोवेळी शासनाच्या विभागांना जिल्हा वरिष्ठ भुवैज्ञानीक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांच्या मार्फत सादर करणे या सर्व जबाबदाऱ्या पार पाडावयाच्या आहेत. सर्व माहितीच्या अचुकते बाबतची सर्वस्वी जबाबदारी ग्रामसेवकाची असेल.

२.२.७.३. जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानीक - ग्रामसेवक व जलसुरक्षक यांची क्षमता बांधणी करणे, माहिती गोळा करणेसाठीचे साहित्य उपलब्ध करुन देणे, प्राप्त माहितीचे विश्लेषण करुन संभाव्य पाणी टंचाई बाबत जिल्हाधिकारी व मुख्य कार्यकारी अधिकारी यांना तसेच संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांना अवगत करुन देणे.

२.२.७.४. जलस्वराज्य कक्ष, संचालनालय, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा - ग्रामस्तरावर माहिती गोळा करणेसाठी मार्गदर्शक सुचना निर्गमीत करणे, माहितीचे आदान प्रदान या करिता कार्यप्रणाली जसे नवीन आज्ञावली विकसीत करवुन घेणे, भ्रमणध्वनी / तत्सम उपकरणासाठी आवश्यक आज्ञावली विकसीत करवुन घेणे, संकेतस्थळावर प्राप्त माहितीचे संकलन व विश्लेषणाचे आधारे अहवाल तयार करुन संचालकांमार्फत तो शासनास सादर करणे व संकेत स्थळावर प्रसिद्ध करणेची जबाबदारी जलस्वराज्य कक्ष, संचालनालय, भूसवियं यांची असेल. या माहितीच्या

आधारावर करावयाच्या प्रतिबंधात्मक उपाययोजना संबंधित जिल्हाच्या अधिकाऱ्यांना तत्काळ ईमेल द्वारे कळविणेत यावी.

२.२.८. सदर उपप्रकल्प राज्यात प्रथमच पथदर्शी स्वरुपात राबविण्यात येत असल्यामुळे कार्यप्रणालीच्या अंमलबजावणी साठी प्रयोगात्मक संशोधन करुन कार्यप्रणाली विकसीत करण्यास अनुमती असेल.

२.२.९. सदर माहिती प्रसिध्द करण्यासाठी अस्तित्वातील संकेतस्थळाकरिता अतिरिक्त मोड्युल विकसीत करण्यास शासन मान्यता देत आहे.

२.२.१०. पर्जन्यमापक, पाणी तपासणी कीट, पाणीपातळी मोजण्यासाठीचे साहित्य, नोंदवही इत्यादी खरेदी करण्याची व गांवस्तरावर उपलब्ध करुन देणेची जबाबदारी भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांची असेल. या अनुषंगाने सदर साहित्य प्रचलीत शासकीय नियमावलीचा व खरेदी प्रणालीचा अवलंब करुन खरेदी करण्यात यावे.

२.३.**जलवेधशाळा बळकटीकरण**

२.३.१. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांचेद्वारे प्रस्तावित करण्यात येणाऱ्या जिल्ह्यांतील जलवेध शाळांमध्ये नविन उपकरणे खरेदी करणे, अस्तित्वातील यंत्रसामुग्री व इमारतींची दुरुस्ती आदि तत्सम कामांना तसेच जुन्या ऐवजी नवीन ठिकाणी जलवेधशाळा प्रस्थापित करणेस मान्यता देण्यात येत आहे. अत्याधुनिक उपकरणांसदर्भात विविध विभागांकडील अनुभवांच्या आधारे त्यांच्या प्रभावी कार्यान्वयनाची खात्री संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांनी करुन घेणेच्या अटीच्या अधिन राहून खरेदीस मान्यता देणेत येत आहे. सर्व उपकरणांची खरेदी शासनाच्या प्रचलीत कार्यप्रणाली नुसार करण्यात यावी.

२.३.२. जलवेधशाळांमध्ये उपकरणे बसविण्यासाठी भारतीय मोसम विभाग व इतर अनुषंगीक विभागांनी निर्गमीत केलेल्या मार्गदर्शक तत्वांचा अवलंब करुन पूर्ण जलवेधशाळा

प्रस्थापित करण्यात यावी. सदरहु प्रकल्प जागतिक बँकेच्या सहाय्याने राबविण्यात यावयाचा असल्याने कुठल्याही तांत्रिक निकषाचे उल्लंघन होणार नाही अथवा पर्यावरणाला बाधा पोहचणार नाही याची काळजी घ्यावी.

## ३. अनुदान वितरण कार्यप्रणाली

३.१.भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेच्या तांत्रिक क्षमता बांधणीसाठी व वैज्ञानिक निष्कर्षांत अधिक अचूकता यावी यासाठी जलस्वराज्य २ कार्यक्रमांतर्गत राबविण्यात यावयाच्या वरील तिनही प्रकल्पासाठीचे अनुदान थेट शासनामार्फत संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांचेकडे सुपूर्त केले जाईल.

३.२.वार्षिक कृती आराखड्यानुसार व मागणीअंती संचालनालयामार्फत अनुदान विभागीय उपसंचालक यांना व जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक यांना देण्यात येईल. प्राप्त अनुदान शासनाच्या निदेशानुसार खर्च करणे व उपयोगिता प्रमाणपत्र सादर करणेची जबाबदारी विभागीय उपसंचालक व जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक यांची राहील. प्रकल्पाचे सर्व समन्वयाची जबाबदारी संचालनालयातील जलस्वराज्य कक्षाची असेल.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१४०७२२१६४९४८९०२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kiran Gitte

Digitally signed by Kiran Gitte
DN: CN = Kiran Gitte, C = IN, S = Maharashtra, O = ALL INDIA SERVICE, OU = IAS
Date: 2014.08.01 16:00:20 +05'30'

**(किरण गित्ते)**
उपसचिव तथा प्रकल्प संचालक,
महाराष्ट्र शासन

प्रत,

१. प्रधान सचिव पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
२. सर्व विभागीय आयुक्त,
३. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
४. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे.
५. महालेखापाल, महाराष्ट्र -१, मुंबई (लेखा परिक्षालेखा व अनुज्ञेयता)
६. महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर (लेखा परिक्षालेखा व अनुज्ञेयता)
७. सर्व जिल्हाधिकारी.
८. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
९. सर्व मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण.
१०. संचालक आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
११. उपसंचालक, आरोग्य सेवा, राज्य सार्वजनीक आरोग्य प्रयोगशाळा, पुणे.
१२. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, नवी मुंबई.
१३. अतिरिक्त संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, नवी मुंबई.
१४. सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद
१५. सर्व जिल्हा शल्यचिकित्सक, सामान्य रुग्णालय.
१६. विशेष संनियंत्रण कक्ष (जलस्वराज्य-२), म.जी.प्रा., भू.स.वि.यं. आणि सार्वजनिक आरोग्य विभाग.
१७. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
१८. उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, (सर्व).
१९. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व).
२०. सर्व अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण.
२१. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व).
२२. सर्व प्रादेशिक उप संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा.
२३. सर्व कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,
२४. सर्व कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद,
२५. सर्व प्रादेशिक/ जिल्हा सार्वजनीक आरोग्य प्रयोगशाळा प्रमुख.
२६. सर्व जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा,
२७. सर्व उपमुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रामपंचायत/ पाणी व स्वच्छता) जिल्हा परिषद
२८. सर्व गटविकास अधिकारी पंचायत समिती.
२९. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व पर्यवेक्षीय अधिकारी व कार्यासने.
३०. मंत्रालयातील सर्व विभाग,
३१. निवड नस्ती, पापु-११.